महाराष्ट्रातील कारागृहांना अन्नधान्य व इतर वस्तुंचा पुरवठा करण्याबाबत.....

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग
शासन निर्णय क्र. जेएमजे-०११८/२[१०१]/पीआरएस्-२
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक [illegible] JAN 1999

वाचा:-१]शासन पत्र, गृह विभाग क्र. डीएफ्पी-०४७७/९[३५३]२५-जे दि. ८.७.७७ यांनी महाराष्ट्र राज्य सहकारी कन्झ्युमर्स फेडरेशन मर्यादित संस्थेस लिहिलेले.

२]महाराष्ट्र शासन, गृह विभाग, निर्णय क्र. डीएफ्पी-०४७७/९-[११५]/पीआरएस्-२, मंत्रालय, मुंबई- ३२ दि. ७ ऑक्टोबर, ७८

३]महाराष्ट्र शासन, गृह विभाग, शासन निर्णय क्र. एमएजे-११८८/१/[१५५]/पीआरएस्-२, मंत्रालय, मुंबई-३२, पीआर, दि. १३ फेब्रुवारी, ८९

शासन निर्णय -

महाराष्ट्र राज्यातील तुरुंगांना अन्नधान्य व इतर वस्तुंचा पुरवठा हा शासन निर्णय क्रमांक एमएजे-११८८-१[१५५]/पीआरएस्-२, दिनांक १३ फेब्रुवारी १९८९ अन्वये महाराष्ट्र राज्य सहकारी कन्झ्युमर्स फेडरेशन मर्यादित या संस्थेमार्फत करण्यात येत होता. सदर पुरवठा करताना शासनातर्फे घालण्यात आलेल्या अटी व शर्ती ह्या कन्झ्युमर्स को-ऑप. फेडरेशनला मान्य नसल्यामुळे त्यात काही अडचणी उद्‌भवत असल्यामुळे सदरचा पुरवठा कन्झ्युमर्स फेडरेशन कडून काढून घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासनाकडे महिला आर्थिक विकास महामंडळ ह्या शासनाच्या अंगीकृत व्यवसाय असलेल्या संस्थेने सदरचा पुरवठा त्यांना देण्याबाबत केलेली विनंती विचारात घेऊन शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, महाराष्ट्रातील सर्व तुरुंगांना अन्नधान्य व इतर अनुषंगिक वस्तुंच्या पुरवठ्याचे काम हे महाराष्ट्र राज्य सहकारी ग्राहक फेडरेशनच्या ऐवजी महिला आर्थिक विकास महामंडळ या निमशासकिय संस्थेस देण्यात यावे. यासंबंधीची कार्यपध्दती कशी असावी तसेच अटी व शर्ती कोणत्या प्रकारे असाव्यात यासंबंधी स्वतंत्रपणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

[ह. भि. तायडे]
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

कारागृह महानिरिक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

कार्यकारी संचालक, महाराष्ट्र को-ऑप. कन्झ्युमर्स फेडरेशन मर्यादित, महाराष्ट्र को-ऑप. कन्झ्युमर्स भवन, प्रिन्सीपाल, शेख हसन रोड नं. १, चिंचबंदर, मुंबई-९.

२........

प्रति,

सर्व कारागृह उप महानिरिक्षक [तुरुंग],

सर्व तुरुंग अधीक्षक,

प्रिन्सीपाल, बोस्टल स्कूल, कोल्हापूर.

महालेखापाल-१,[लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र मुंबई.

महालेखापाल-१,[लेखा परिक्षा], महाराष्ट्र मुंबई.

महालेखापाल-२, [ले. व अ.] महाराष्ट्र नागपूर.

महालेखापाल-२, [लेखा परिक्षा], महाराष्ट्र नागपूर.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

कृषी व सहकारी विभाग [२४ सी] मंत्रालय, मुंबई.

वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.